**महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय मुंबई व सहकार न्यायालय व कार्यालयांकरीता एपीजे हाऊस, दिनशा वाच्छा रोड, चर्चगेट येथे तिसरा मजला (भागश:) पाचवा व सहावा मजल्यावर सहकारी न्यायालये क्रमांक १ ते ४ व महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई यांचे कार्यालयासाठी फर्निचर व्यवस्था व नुतनीकरण करण्यासाठी प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१८/प्र.क्र.६५/२२-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय मुंबई ४०००३२.
दिनांक- १३ जून, २०१८.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय मुंबई व सहकार न्यायालय व कार्यालयांकरीता एपीजे हाऊस, दिनशा वाच्छा रोड, चर्चगेट येथे तिसरा मजला (भागश:) पाचवा व सहावा मजला मिळून १४६६०.१५ वर्ग फूट इतकी जागा भाडेतत्वावर घेण्यात आलेली आहे. या जागेतील फर्निचर व बांधकामाचे नकाशे तयार करुन सार्वजनिक बांधकाम विभागाने अंदाजपत्रक सादर केले आहे. सदर अंदाजपत्रकास मान्यता देण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय मुंबई व सहकार न्यायालय व कार्यालयांकरीता एपीजे हाऊस, दिनशा वाच्छा रोड, चर्चगेट येथे तिसरा मजला (भागश:) पाचवा व सहावा मजला मिळून १४६६०.१५ वर्ग फूट इतकी जागा भाडेतत्वावर घेण्यात आलेली आहे. या जागेतील फर्निचर व बांधकामाचे नकाशे तयार करुन सार्वजनिक बांधकाम विभागाने रु. २,०४,८९,९८५/- (दोन कोटी चार लाख एकोणनव्वद हजार नऊशे पंच्यांऐंशी फक्त ) चे अंदाजपत्रक सादर केले आहे. सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्याची विनंती निबंधक, महाराष्ट्र राज्य सहकार अपील न्यायालय, मुंबई यांनी केली आहे.

महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय मुंबई व सहकार न्यायालय व कार्यालयांकरीता एपीजे हाऊस, दिनशा वाच्छा रोड, चर्चगेट येथे १४६६०.१५ चौ. फुट जागेत फर्निचर व बांधकामाकरिता येणाऱ्या रु. २,०४,८९,९८५/- (दोन कोटी चार लाख एकोणनव्वद हजार नऊशे पंच्यांऐंशी फक्त ) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्यात येत आहे.

उपरोक्त प्रस्तावासोबत जोडलेले अंदाजपत्रक व आराखडे अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, इलाखा शहर मुंबई यांनी साक्षांकित केले आहेत. सदर खर्च खालील लेखाशिर्षाखाली करण्यात यावा.

| | |
|---|---|
| मागणी क्र. | व्ही-२, |
| मुख्य/गौण/उपशिर्ष | २४२५, सहकार,००१-संचालन व प्रशासन<br>(०१) (०९) महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय (२४२५ ०१०२)<br>(योजनेतर) (दत्तमत)<br>१३ कार्यालयीन खर्च |

सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २८६/इमा-२, दिनांक २९.०५.२०१८ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २६८/२०१८/व्यय २ दि. १२.६.२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या बेवसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८०६१३१७३०४३७५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Deepak S Desai

Digitally signed by Deepak S Desai
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMT Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d11b2ee4dfa01facc6e58028a3bde93d4ac81d87ed6247ca0fb3a827602426f, cn=Deepak S Desai
Date: 2018.06.13 17:35:11 +05'30'

**(दि. शि. देसाई)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई
५. निबंधक, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई
६. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई.
७. महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. मुख्य अभियंता, (सा.बा.), प्रादेशिक विभाग, मुंबई.
९. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, इलाखा शहर, मुंबई.
१०. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, इलाखा शहर, मुंबई.
११. कार्यकारी अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
१२. उपसचिव, कार्यासन (५-स), (१२-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
१४. अवर सचिव (१७-स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती (२२-स)